महाराष्ट्र शासन

क्रमांक :सीबीसी-१०/२००७ /प्र.क्र.२५०/मावक-५,
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०११

**प्रति,**
सर्व जिल्हाधिकारी/जिल्हा दंडाधिकारी,
महाराष्ट्र राज्य.

विषय : महाराष्ट्र राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थाच्या राखीव प्रभागामधुन निवडणूक लढवू इच्छिणा-या मागासवर्गीय उमेदवारांचा जाती दावा पडताळणी करण्याबाबत.

संदर्भ :- शासन पत्र समक्रमांक, दि.२०.०९.२०११, दि.७.१०.२०११ व दि.२४.१०.२०११

राज्यातील **माहे जानेवारी, २०१२ ते मार्च, २०१२** या कालावधीत होणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थेच्या उदा.महानगरपालिका, जिल्हा परिषद, इत्यादी निवडणुकीत मागासवर्गीयासाठी आरक्षित असलेल्या प्रभागात निवडणुक लढवू इच्छिणा-या **अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग तसेच विशेष मागासप्रवर्ग** या प्रवर्गातील मागासवर्गीय उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्र पडताळणीचे प्रस्ताव **दि.१५ नोव्हेंबर, २०११ पर्यंत स्विकारण्याबाबतच्या सुचना** संदर्भाधीन दि. २४ ऑक्टोबर २०११ च्या पत्रान्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापी, राज्यातील विविध कर्मचारी संघटनांनी दि. १५/११/२०११ रोजी आयोजीत केलेल्या लाक्षणिक संपामुळे काही इच्छूक उमेदवारांना त्यांचे जाती दाव्याचे प्रस्ताव संबधित जिल्हाधिकारी कार्यालयात सादर करण्यास अडचणी निर्माण झाल्या. त्यामुळे अशा इच्छुक मागासवर्गीय उमेदवाराचे जाती दाव्याचे प्रस्ताव पडताळणीकरिता स्वीकारण्यासाठी **मुदत वाढवून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.**

२. आता, या आदेशान्वये सर्व संबंधित प्राधिकाऱ्यांना सूचित करण्यात येत आहे की, **माहे जानेवारी, २०१२ ते मार्च, २०१२** या कालावधीत होणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या उदा.महानगरपालिका, जिल्हा परिषद इत्यादी यामधील निवडणूकीकरिता राखीव प्रभागातून निवडणूक लढवू इच्छिणाऱ्या अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग तसेच विशेष मागासप्रवर्ग या प्रवर्गातील मागासवर्गीय उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्र पडताळणीचे प्रस्ताव विहित नमून्यात आवश्यक त्या कागदपत्रांसह / पुराव्यांसह संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाने **दि.२१ नोव्हेंबर, २०११ पर्यंत स्विकारावेत.** तत्पूर्वी सदर अर्ज स्विकारण्याबाबत देण्यात आलेल्या वाढीव मुदतीची माहिती स्थानिक जनतेस व्यापक प्रसिध्दीव्दारे देण्यात यावी. याबाबत पुन्हा निर्देशित करण्यात येत आहे की, सदर प्रस्ताव स्विकारण्याची वाढीव मुदत ही **दि.२१ नोव्हेंबर,२०११** राहील याची नोंद घ्यावी.

३. याबाबत, संदर्भाधिन पत्रान्वये देण्यात आलेल्या उर्वरित सर्व सूचनांचे पालन करुन अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करण्यात यावा.

( भा. सु. तायडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीकरिता-**

१.सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य
२.संचालक, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३.सर्व सदस्य /सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी, विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती क्र.१,२ व ३.
४. सर्व सदस्य सचिव तथा विशष जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती.